**महाराष्ट्र गट-क सेवा मुख्य परीक्षा - २०२१**
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफरस केलेल्या, प्रतीक्षायादीवरील उमेदवारांचे विमा संचानालयातील तांत्रिक सहायक, गट-क पदावर नियतवाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**क्र. आस्थाप-२०१९/प्र.क्र.११/विमा प्रशासन,**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ मार्च, २०२३

**पहा :-** (१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१४४२/गट-क संयुक्त-तांस./२०२१/चोवीस, दिनांक २०.१२.२०२२ आणि दि.२३.०२.२०२३
(२) शासन ज्ञापन क्र.आस्थाप-२०१९/प्र.क्र.११/विमा प्रशासन, दि.२७.१२.२०२२ आणि दि.०९.०२.२०२२

**ज्ञापन :-**

महाराष्ट्र गट-क सेवा ( मुख्य ) परीक्षा -२०२१ या परीक्षेच्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दि.२३.०२.२०२३ च्या पत्रान्वये विमा संचालनालयातील तांत्रिक सहायक संवर्गाच्या प्रतीक्षायादीवरील ०६ उमेदारांची शिफारस केलेली आहे. त्यानुसार सोबतच्या विवरणपत्र-अ मधील ०६(सहा) उमेदवारांचे विमा संचालनालयात तांत्रिक सहायक, गट-क पदावर नियतवाटप करण्यात येत आहे.

२. सोबतच्या विवरपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची नेमणूक, **महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या दि.२०.१२.२०२२ आणि दि.२३.०२.२०२३ च्या पत्रात नमूद केलेल्या सूचनांच्या आणि खाली नमूद केलेल्या** अटी व शर्तींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात यावी :-

(१) सदर विवरणपत्रातील सर्व उमेदवारांनी दि.०३.०४.२०२३ पर्यंत विमा संचालनालयात व्यक्तिश: उपस्थित राहून अस्थायी नियुक्तीचा स्विकार करणे आवश्यक आहे. सदरहू कालावधीत उमेदवाराने अस्थायी नियुक्ती स्विकारली नाही तर त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता या विभागाच्या / महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल.

(२) प्रस्तुत पदासाठी आयोगाने ऑनलाईन पद्धतीने अर्ज मागविलेले आहेत. त्यामुळे उमेदवारांची प्रमाणपत्रे आयोगाकडे उपलब्ध झालेली नाहीत. तसेच उमेदवाराच्या प्रमाणपत्रांची / दाव्यांची तपासणी / पडताळणी आयोगाने केलेली नाही. यास्तव, नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित राहताना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या, महाराष्ट्र गट-क सेवा मुख्य परीक्षा-२०२१ साठी देण्यात आलेल्या जाहिरात क्र.५८/२०२२ ते ६२/२०२२ दि.२८ जून, २०२२ मध्ये नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची दि.०१ एप्रिल,२०२२ रोजीच्या अर्हतेनुसार, शैक्षणिक आणि अन्य अटींची दिनांक १४ जुलै,२०२२ रोजीच्या अर्हतेनुसार खाली नमूद केलेली मूळ प्रमाणपत्रे उमेदवारानी सोबत घेऊन जावीत. नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित राहताना सदर प्रमाणपत्रांची साक्षांकित प्रत उमेदवाराजवळ असणे आवश्यक आहे:-

(i) वयोमर्यादा (दि.०१.०४.२०२२ रोजी)

(ii) अधिवास : मुख्य परीक्षेच्या जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे

(iii) शैक्षणिक अर्हता - एखाद्या संविधीमान्य विद्यापीठाची पदवी किंवा तिच्याशी समतुल्य असणारी शासनाने घोषित केलेली इतर कोणतीही तत्सम अर्हता. मुख्य परीक्षेचा अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास (दि.१४.०७.२०२२) किंवा तत्पूर्वी पूर्ण केली असेल तरच त्याला पदवीधर समजण्यात येईल.

(iv) अंतर्वासिता (INTERNSHIP) निर्धारित केली असेल अशी पदवी धारण करणाऱ्या उमेदवारांनी अंतर्वासिता (INTERNSHIP) मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारणाच्या दिनांकापर्यंत (दि.१४.०७.२०२२ किंवा तत्पुर्वी) पूर्ण केली असेल तरच त्याला पदवीधर समजण्यात येईल.

(v) प्रस्तुत परीक्षेची जाहीरात दिनांक २८.०६.२०२२ रोजी विज्ञापित केलेली आहे. वि.जा.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., आ.दु.घ. व इ.मा.व. प्रवर्गाचा तसेच महिला वर्गवारीचा दावा केला असल्यास अशा उमेदवारांच्या बाबतीत शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.सीबीसी-२०१३/ प्र.क्र.१८२/ विजाभज-१, दिनांक १७ ऑगस्ट, २०१३ अन्वये जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याच्या नॉन क्रिमीलेयर प्रमाणपत्राचा कालावधी विचारात घेण्यात येईल.

(vi) प्रस्तुत परीक्षेच्या जाहिरातीमधील परिच्छेद ६.५.५ नुसार मराठी ज्ञान आवश्यक आहे. सदर बाब संबंधित उमेदवारांच्या दहावीच्या गुणपत्रकाआधारे किंवा महाविद्यालयाच्या प्राचार्य/विभाग प्रमुखांच्या प्रमाणपत्राआधारे तपासून घेण्यात यावी.

(vii) इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाच्या दि. ३१-०१-२०२० च्या शासन निर्णयानुसार खुल्या प्रवर्गातील महिला, विजाभज, इमाव व विमाप्रवर्गातील व्यक्ती, शैक्षणिक व सामाजिकदृष्टया मागासप्रवर्ग आणि या प्रवर्गात समाविष्ट मराठा समाज आणि आर्थिकदृष्टया दुर्बल प्रवर्ग या प्रवर्गातील प्रगत व उन्नत गटात समाविष्ट नसलेल्या व्यक्तीना सक्षम प्राधिकारी यांनी निर्गमित केलेल्या NCL प्रमाणपत्राच्या वैधता पडताळणीसाठी राज्यातील प्रादेशिक महसूली विभाग स्तरावर "विभागीय आयुक्त" यांच्या अध्यक्षतेखाली NCL प्रमाणपत्र (उत्पन्नाच्या दाखल्याची) वैधता पडताळणी समिती गठीत करण्यात आली आहे. महिलांच्या आरक्षित पदावर शिफारस करण्यात आलेल्या महिला उमेदवारांचे तसेच अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती व्यतिरिक्त इतर सर्व मागास प्रवर्गातील उमेदवरांचे उन्नत व प्रगत गटात (क्रीमिलेयर) मोडत नसल्याचे सक्षम प्राधिकारीऱ्यांनी दिलेल्या NCL प्रमाणपत्राची वैधता संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी सदर समितीकडून उपरोक्त नमुद शासन निर्णयातील तरतुदीनुसार तपासून घेण्याची कार्यवाही करावी.

(३) उमेदवारांच्या पात्रता विषयक म्हणजेच शिक्षण, वय, खेळाडू, दिव्यांग, जाती विषयक प्रमाणपत्र, इत्यादीबाबतच्या मूळ प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाने तसेच या विभागाने केली नसल्यामुळे या सर्व बाबतीत नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी पडताळणी करणे आवश्यक आहे. प्रस्तुत उमेदवारांचे शिक्षण, वय, खेळाडू असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, शारीरिक अपंग असल्यास त्याबाबतची प्रमाणपत्रे, इत्यादीबाबतची मूळ प्रमाणपत्रेही अधिसूचनेत नमूद केलेल्या अर्हतेनुसार आहेत किंवा कसे? हे विमा संचालनालयाने उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती करतानाच प्रथम तपासून पहावीत. आयोगाला केलेल्या अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक व योग्य ती प्रमाणपत्रे उमेदवार नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सादर करु शकला नाही तर, उमेदवाराची नियुक्ती करण्यात येणार नाही व उमेदवाराची शिफारस आपोआप रद्द समजण्यात येईल व तसे आयोगाला कळविण्यात येईल.

(४) खेळाडूंसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची शिफारस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.०१.०७.२०१६, रोजीच्या शासन निर्णयानुसार तसेच, त्यास अनुसरुन प्रसिद्ध करण्यात आलेल्या दि.१८.०८.२०१६ रोजीच्या शुद्धिपत्रकातील तरतुदीनुसार, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१७१७/प्र.क्र.३९/क्रीयुसे-२, दि.१७.०३.२०१७, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१७१७/प्र.क्र.३९/क्रीयुसे-२, दि.२७.०३.२०१७, शासन शुद्धिपत्रक क्र.राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.१०.१०.२०१७, व शासन शुद्धिपत्रक क्र.राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.१५.११.२०१७, शासन शुद्धिपत्रक क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.११.०३.२०१९ व दि.२४.१०.२०१९ रोजीच्या शुद्धिपत्रकातील तरतुदीनुसार आणि तद्नंतर शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार तांत्रिक सहायक, गट-क पदांसाठी निश्चित केलेली क्रीडा विषयक अर्हता व क्रीडा प्रमाणपत्र पूर्व परीक्षेच्या अर्ज स्विकारण्याच्या दि.११.०१.२०२२ रोजी किंवा तत्पूर्वी धारण करणे आवश्यक राहील. तसेच त्यासंदर्भातील संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालकांचा क्रीडा प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल नियुक्तीपुर्वी विमा संचालनालयाकडे सादर करणे आवश्यक राहील. सदर क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल विमा संचालनालयाच्या स्तरावरुन तपासून संबंधित उमेदवाराच्या तांत्रिक सहायक, गट-क पदावरील नियुक्तीबाबतची कार्यवाही, संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालकाच्या दि.११.०१.२०२२ रोजीचा किंवा तत्पूर्वीचा क्रीडा प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल सादर करण्याच्या अधीन, करण्यात आलेली आहे. त्यानुसार गट-क पदाकरिता ग्राह्य असल्याबाबतच्या संबंधित विभागीय उपसंचालकांच्या वर उल्लेखित विहित दिनांकाच्या पडताळणी अहवालाच्या तपासणीनंतरच गुणवत्ताधारक खेळाडू पदावर शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यात यावी.

(५) दिव्यांगांसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची प्रमाणपत्रे वैद्यकीय मंडळाकडून तपासून घेण्याच्या अधीन राहून त्यांची शासनाकडे

शिफारस करण्यात आलेली आहे. तसचे सा.प्र.वि, शा.नि. क्र.अपंग १००३/ प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ०६-०५-२००४ मधील बाब क्र. (६) नुसार त्यांच्या नेमणुकीपूर्वी उमेदवार संबंधित पदावर नियुक्तीसाठी सक्षम आहे किंवा नाही याची वैद्यकीय मंडळाकडून तपासणी केल्यानंतर ते नेमणुकीस पात्र ठरतील. दिव्यांगंसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. अप्रकि-२०१२/प्र.क्र.२९७/आरोग्य-६, दिनांक ६.१०.२०१२ मधील आदेशानुसार SADM या नवीन संगणक प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगतवाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.अप्रकि २०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६, दि.१४.०९.२०१८ मधील आदेशानुसार केंद्र शासनाच्या www.swavlambancard.gov.in या संगणकीय प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील किमान ४०% कायमस्वरुपी दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र विमा संचालनालयास नियुक्तीपूर्वी सादर करणे अनिवार्य राहील. तसेच दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ च्या आधारे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. दिव्यांग-२०१८/प्र.क्र.११४/१६-अ, दि.२९.०५.२०१९ तसेच या संदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार आरक्षणासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी. तसेच खाली नमूद करण्यात आलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांमधील सूचनांनुसार कार्यवाही करण्यात येईल :-

(अ) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग १००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ६.५.२००४

(ब) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२००९/ प्र.क्र.९/सुधार-३, दिनांक ३.८.२०१०

(क) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन परिपत्रक क्रमांक : अपंग २००९/ प्र.क्र.१३३/सुधार-३, दिनांक १४.१.२०११

(ड) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अप्रकि २०१२/प्र.क्र.२९७/ आरोग्य-६, दिनांक ६.१०.२०१२

(६) ज्या मागासवर्गीय उमेदवारांची खुल्या प्रवर्गातील पदावर शिफारस करण्यात आली असेल त्या उमेदवारांबाबत सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीबीसी-१०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दि.१६.०५.२००७ मधील सूचनेनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(७) (अ) मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपद्धतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीसीसी-२०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दि.१८.०५.२०१३ मध्ये नमूद सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करणे अपेक्षित असून, मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दि.१२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता

तपासण्याच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येईल. सदरहू उमेदवाराकडे जात पडताळणी समितीकडून प्राप्त करुन घेतलेले जात वैधता प्रमाणपत्र असल्यास त्याने नियुक्तीसाठी हजर होताना ते सादर करावे. नसल्यास त्याने जात प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे/ प्रमाणपत्रे विमा संचालनालयास तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

(ब) विमा संचालनालयाने विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठवावी. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेले कागदपत्रे/पुरावे सादर करुन पाठपुरावा करावा. जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून ते संबंधित समितीकडून निर्गमित करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही देखील नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी.

(क) शिफारस करण्यात आलेल्या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे दावे आयुक्त, आदिवासी विकास व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून तपासून घेण्याबाबत तसेच अन्य सर्व मागासवर्गीय उमेदवारांचे जाती/जमातीचे दावे नियुक्तीपूर्वी संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे यांचेकडून तपासून घेण्यात यावे.

(८) तांत्रिक सहायक, गट-क पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/ ३९, दि.१९.०३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.E.A.C.C. सोसायटीच्या अधिकृत C.C.C. किंवा O स्तर किंवा B किंवा C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्र.मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९, दि.०४.०२.२०१३ व शासन पूरकपत्र क्र.मातंसं २०१२/ प्र.क्र.२७०/३९, दिनांक ०८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र/ अर्हता उमेदवारांकडे नसल्यास नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षाच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास शासन अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१७/ प्र.क्र.४६२/ कार्या.१२, दिनांक २८-०५-२०१८ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल ही बाब उमेदवाराच्या नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी.

(९) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १३.०८.२०१४ तसेच अन्य अद्यावत शासन निर्णयामधील तरतूदीआधारे सदर तांत्रिक सहायकांच्या शिफारशी करण्यात येत आहेत. शासनाने यासंदर्भात वेळोवेळी केलेल्या सूचना

विचारात घेता तांत्रिक सहायकांच्या पदाकरिता अमागास समांतर आरक्षित पदांसाठी शिफारसपात्र ठरलेले उमेदवार हे प्रत्यक्षात खुल्या (अराखीव) प्रवर्गातीलच उमेदवार आहेत याची त्यांच्या शाळा/ महाविद्यालय सोडल्याच्या दाखल्याआधारे तसेच अन्य तदनुषंगिक दस्तऐवजा आधारे नियुक्तीपूर्वी खात्री व पडताळणी करुनच त्यांना तांत्रिक सहायक पदावर नियुक्ती देण्यात यावी.

(१०) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारसप्राप्त ठरलेल्या ६ उमेदवारांनी मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राच्या प्रती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपलब्ध करुन दिल्या आहेत. ते उमेदवारांच्या प्रोफाईल सोबत विमा संचालनालयास उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. उमेदवारांच्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत / अर्जातील फोटो यावरुन प्रत्यक्षात रुजू झालेला उमेदवार तोच आहे का, तसेच मुख्य परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्रावरुन अर्जातील उमेदवाराचा फोटो व स्वाक्षरी, ओळखपत्रातील फोटो व स्वाक्षरी त्याच उमेदवाराची आहे का, सादर केलेले ओळखपत्र अधिकृत आहे का, याची नियुक्तीपूर्वी सखोल तपासणी करावी. तसेच उमेदवारांनी परीक्षेच्यावेळी सादर केलेल्या ओळखपत्राची वैधता संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांकडून तपासून घेण्यात यावी. तद्नंतरच संबंधित उमेदवाराची तांत्रिक सहायक पदावर नियुक्ती करण्यात यावी.

(११) श्री.मोटे युवराज अरविंद यांनी प्रस्तुत परीक्षेकरिता सादर केलेल्या ऑनलाईन अर्जात त्यांच्याविरुद्ध न्यायालयीन प्रकरणी / फोजदारी खटला दाखल / प्रलंबित असल्याचे नमूद केले आहे. सदर बाबबीची खातरजमा करुन त्यांच्या नियुक्तीसंदर्भतील कार्यवाही करण्यात यावी.

(१२) साक्षांकन नमुना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांनी तो तेथून डाऊनलोड करावा. सदर साक्षांकन नमुना पूर्णपणे भरुन उमेदवाराने विमा संचालनालय, मुंबई येथे हजर होताना सादर करावा. हजर झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करुन घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चापअ १००८/ प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दि.०९.०१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकूल असल्यास, प्रस्तुत शासन निर्णयातील सूचनांनुसार संबंधित उमेदवारांच्याबाबत तातडीने कार्यवाही करुन तसे या विभागास अवगत करावे. **"प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल."** असा स्पष्ट उल्लेख उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात करण्यात यावा. उमेदवाराच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक क्र.चापअ-१०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दि.२६.०८.२०१४ मधील सूचनादेखील विचारात घेण्यात याव्यात.

(१३) प्रस्तुत परीक्षेचा अंतिम निकाल मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण व मा.उच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या विविध मूळ अर्ज/ याचिका प्रकरणी

होणाऱ्या अंतिम निकालाच्या अधीन राहून जाहीर करण्यात आला आहे, ही बाब विचारात घेऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने महाराष्ट्र गट-क सेवा मुख्य परीक्षा, २०२१ मधून उमेदवारांची शिफारस केली आहे याची उमेदवारांनी नोंद घ्यावी.

(१४) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.टीआरएन-२०१४/३४२/प्र.क्र.५०/ १४/१२-अ, दि.२७.०५.२०१४ व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.कअप-१२१४/प्र.क्र.६५/१४ब, दि.१३.०५.२०१५ नुसार सर्व संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार (पायाभूत) प्रशिक्षण अनिवार्य आहे. त्यानुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी / कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी सक्तीने उपस्थित राहणे गरजेचे असून, प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/कर्मचारी यांना संबंधित विभागप्रमुख यांनी कार्यमुक्त करणे देखील सक्तीचे आहे.

(१५) **विमा संचालनालयातील तांत्रिक सहायकांची १४ पदे भरावयाची असल्याचे परीक्षेच्या जाहिरातीत स्पष्ट करण्यात आले होते. यास्तव, नियतवाटप केलेल्या उमेदवारांची अन्य कार्यालयात पुर्नवाटप करण्याबाबतच्या विनंतीचा विचार करण्यात येणार नाही.**

(१६) **प्रतीक्षायादीतून शिफारसपात्र ठरणाऱ्या उमेदवारांचा गुणवत्ताक्रम हा यापूर्वी शिफारस केलेल्या शेवटच्या उमेदवारानंतरच राहील**, ही बाब नियुक्ती आदेशात स्पष्टपणे नमूद करण्यात यावी.

(१७) मुंबईबाहेरील उमेदवारांनी त्यांच्या मुंबईतील निवासस्थानाबाबतची व्यवस्था स्वतःच करावयाची असून त्यासाठी **मुदतवाढ दिली जाणार नाही.**

(१८) अस्थायी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित रहाण्याकरीता लागणारा प्रवास खर्च उमेदवाराने स्वतःच सोसावयाचा आहे.

(१९) उमेदवाराने नियुक्ती स्विकारल्यानंतर सोबत जोडलेला रुजू अहवाल या कार्यासनास तात्काळ सादर करावा.

(२०) विमा संचालनालयाने नियुक्तीसाठी रुजू होणाऱ्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी व त्यासोबतचे प्रतिवेदन कोणत्याही परिस्थितीत नियुक्तीनंतर तात्काळ या विभागाकडे पाठविण्यात यावे.

(२१) उक्त नमूद अटींची पूर्तता न झाल्यास उमेदवारांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

३. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०३०३११५५४५९१०५ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VIVEK RAMBHAJI DAHIPHALE

Digitally signed by VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=56142975484e58364afe88f5f0e3138e3ce0d4e4058e42f003dfd69500064afb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=3981A50612646983D580DEA2DA5FB52A33D8E6E3C4F34CD80F08C598711CEB65, cn=VIVEK RAMBHAJI DAHIPHALE
Date: 2023.03.03 11:59:50 +05'30'

**( वि. रं. दहिफळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) संचालक, विमा संचालनालय, गृहनिर्माण भवन (म्हाडा), २६४, पहिला मजला, कलानगर समोर, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४०० ०५१ यांना उपरोक्त सहपत्रांसह

२) सह सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५,७,८वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०० ०२१ (पत्राद्वारे)

३) सर्व संबंधित उमेदवार, यांना रुजू अहवालाचा नमुना प्रतीसह (ई मेल द्वारे)

४) निवडनस्ती (विमा प्रशासन)

| | | |
|---|---|---|
| विमा संचालनालयासाठी सहपत्रे | १) | महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१४४२/गट-क संयुक्त तांस./२०२१/चोवीस, दिनांक २०.१२.२०२२ आणि दि.२३.०२.२०२३ ची प्रत |
| | २) | उमेदवारांच्या नावांची यादी (उमेदवारांचा भ्रमणध्वनी व ई मेल क्रमांकासह) |
| | ३) | उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत व ओळखपत्राची प्रत (मूळ), |
| | ४) | प्रतिवेदन नमुना (उमेदवार दि.०३.०४.२०२३ **पर्यंत** विभागात हजर न झाल्यास उमेदवाराच्या आवेदनपत्राच्या संगणकीय प्रतीसह) कोणत्याही परिस्थितीत दि.०४.०४.२०२३ पर्यंत या विभागास पाठविण्यात यावा. |

## तांत्रिक सहायक, गट-क

## महाराष्ट्र गट-क सेवा मुख्य परीक्षा -२०२१ मधून विमा संचालनालयास करावयाचे प्रतीक्षायादीवरील उमेदवारांचे नियतवाटप

वित्त विभाग, ज्ञापन क्र.आस्थाप-२०१९/प्र.क्र.११/विमा प्रशासन, दि.०३.०३.२०२३ सोबतचे विवरणपत्र-अ

| अ. क्र. | म.लो.आ. शिफारस क्रमांक | नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | म.लो.आ. शिफारस प्रवर्ग | कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | Vivek Shivaji Shirsath | OBC | OBC – General – WT-1 | विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. (पत्ता :- खोली क्र.२६४, पहिला मजला, गृहनिर्माण भवन (म्हाडा), कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१) |
| २ | २ | PISE PRAGATI SARJERAO | NT-C Female | OPEN – Female - WT - 1 | |
| ३ | ३ | MIRGE PRANJALI RUKMINIKANT | OPEN Female | OPEN – Female - WT- 2 | |
| ४ | ४ | MOTE YUVRAJ ARVIND | NT-C Ex Ser | OPEN – Ex Ser - WT-1 | |
| ५ | ५ | DHIRBASSI BHAGYASHRI HIRASING | ST Female | ST – Female – WT-1 | |
| ६ | ६ | SADMEK ADITYA ASHOK | ST | ST - Genera l - WT-1 | |

## उमेदवारांसाठी रुजू अहवाल

| | | |
|---|---|---|
| उमेदवाराचे नांव | : | |
| उमेदवाराची जन्मतारीख | : | |
| उमेदवाराची शैक्षणिक अर्हता | : | |
| उमेदवाराचा शिफारस क्रमांक | : | |
| उमेदवाराचा स्वत:चा मूळ प्रवर्ग | : | |
| म.लो.आ. ने ज्या प्रवर्गातून शिफारस केली तो प्रवर्ग | : | |
| उमेदवाराचा भ्रमणध्वनी क्रमांक | : | |
| उमेदवाराचा ई-मेल आय.डी. | : | |

प्रति,

सह सचिव(विमा प्रशासन),
वित्त विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

**विषय :-** महाराष्ट्र गट-क सेवा ( मुख्य ) परीक्षा -२०२१ या परीक्षेतील तांत्रिक सहायक, गट-क मधून विमा संचालनालयात रुजू झाल्याचा अहवाल.

महोदय,

मी खाली सही करणार श्री/श्रीमती ______________________ नमूद करतो/ करते की, आपले ज्ञापन क्रमांक आस्थाप-२०१९/प्र.क्र.११/विमा प्रशासन, दि.----------, अनुसार मी विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, गृहनिर्माण भवन (म्हाडा), २६४, पहिला मजला, कलानगर समोर, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१ यांचे कार्यालयात दिनांक __________रोजी रुजू झालो/ झाले. सदरहू माहिती आपणास उचित कार्यवाहीसाठी कळविण्यात येत आहे.

आपला/आपली विश्वासू,

( )

उमेदवाराची सही व नांव

**टीप :**

(१) नियतवाटप केलेल्या, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयात हजर झाल्यानंतर उमेदवाराने वरील पत्र या विभागाकडे (वित्त विभाग, विमा प्रशासन ) तात्काळ पाठवावे. अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारली नाही असे समजून योग्य ती पुढील कार्यवाही केली जाईल याची त्यांनी नोंद घ्यावी

(२) ज्ञापनामध्ये उमेदवाराच्या नावापुढे दर्शविलेला क्रमांक हा त्याचा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडील शिफारस यादीतील क्रमांक आहे. तो क्रमांक वर दर्शविलेल्या ठिकाणी नमूद करावा.

## नियतवाटप केलेल्या आयोग पुरस्कृत उमेदवारासंबंधी प्रतिवेदन

क्रमांक : विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य

दिनांक :

प्रति,

सह सचिव(विमा प्रशासन),
वित्त विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.

विषय :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या, प्रतीक्षायादीवरील उमेदवारांची तांत्रिक सहायक गट-क पदावर नियुक्ती
सरळसेवा महाराष्ट्र गट-क सेवा (मुख्य) परीक्षा २०२१
संदर्भ :- वित्त विभागाचे क्र.आस्थाप-२०१९/प्र.क्र.११/विमा प्रशासन, दिनांक ०३.०३.२०२३ चे ज्ञापन.

संदर्भाधिन उमेदवारांबाबतचे प्रतिवेदन पुढीलप्रमाणे आहे :-

**(अ) नियुक्ती स्वीकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

**(ब) नियुक्ती न स्वीकारणारे उमेदवार**

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | शिफारस क्रमांक |
|---|---|---|
| | | |

वरील (अ) येथे दर्शविलेल्या उमेदवारांनी योग्य ती प्रमाणपत्रे सादर केली असून ते विमा संचालनालयातील तांत्रिक सहायक गट-क पदावरील नियुक्तीकरीता आवश्यक त्या सर्व अटी पूर्ण करीत असल्याने त्यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्यांच्या प्रती सोबत जोडण्यात आल्या आहेत. तसेच विहित कालावधीत नियुक्ती न स्विकारणाऱ्या (ब) येथे दर्शविलेल्या उमेदवारांचे मूळ अर्ज (उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या आवेदनपत्राची संगणकीय प्रत) सोबत परत पाठविण्यात येत आहेत.

सहपत्र :- वरीलप्रमाणे (सही व पदनाम)